सन २०२५ आपटा पाने हंगामाकरीता शासकीय/ खाजगी भुमितून आपटा पाने खरेदी दरास मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.आपटा-२०२४/प्र.क्र.९४/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ११ मार्च, २०२५**

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, अधिसूचना क्र.आपटा-२०२४/प्र.क्र.९४/फ-९, दि.२०.०१.२०२५
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ट वनोपज) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२०(३)/ प्र.क्र.०८/५३६/२०२४-२५, दिनांक ३०.०१.२०२५

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र वनोत्पादन (व्यापाराचे विनियमन) अधिनियम, १९६९ च्या तरतुदीनुसार वाचा येथील नमुद क्र. १, दिनांक २०.०१.२०२५ रोजीच्या शासन अधिसूचनानुसार गठीत करण्यात आलेल्या सल्लागार समितीची दिनांक २७.०१.२०२५ रोजी विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई यांचे अध्यक्षतेखालील बैठकीत झालेल्या चर्चेनुसार आपटा पाने खरेदी दराबाबत शिफारस करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने वाचा येथील नमुद क्र.२ येथील पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ठ वनोपज) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सल्लागार समितीने शिफारस केल्यानुसार सन २०२५ च्या आपटा हंगामाकरिता शासकीय / खाजगी भुमितून आपटा पाने खरेदी दरास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वनोपज (व्यापार नियमन) अधिनियम, १९६९ च्या कलम ६ खाली नियुक्त केलेल्या सल्लागार समितीच्या शिफारशीस अनुसरुन, सन २०२५ च्या आपटा हंगामासाठी शासकीय / खाजगी भूमीतून आपटा पाने खरेदी दर पुढील प्रमाणे निश्चित करण्यात येत आहेत :-

| अ.क्र. | प्रभागातील घटक | सन २०२५ च्या हंगामा करीता सल्लागार समितीने शिफारस केलेले संकलन / खरेदी दर (रुपये प्रतिक्विंटल) | |
|---|---|---|---|
| | | शासकीय भूमीतून खरेदी दर रुपये | खाजगी भूमीतून खरेदी दर रुपये |
| १ | ठाणे, नाशिक, कोल्हापूर, पुणे, धुळे सदर वनवृत्तातील सर्व वन विभाग (ठाणे वनवृत्तातील रोहा वनविभाग व डहाणू वनविभागातील घटक क्र.१, २ व ४) | १४९०.८० | १६३७.१२ |
| २ | ठाणे (डहाणू वनविभागातील घटक क्रमांक १,२ व ४) आणि रोहा वनविभागातील सर्व घटक) | १६३७.१२ | १८२७.४३ |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१११३१८०७३७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7e3227e15fe5debe28837d6e68d17c1f6e96d1a6dc7f27bc7e0f3ec07bbdfab8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B1AFE499C80878329FBB017E4922F7356CC5EDC76102E8FF88C7B9A67A322D9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2025.03.11 13:19:28 +05'30'

**(विवेक होशिंग)**

**उप सचिव (वने), महाराष्ट्र शासन**

प्रति:-

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अकाष्ठ वनोपज ) महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)
४. विभागीय आयुक्त (सर्व)
५. जिल्हाधिकारी (सर्व)
६. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे / नाशिक / पुणे / नागपूर / अमरावती/ छत्रपती संभाजीनगर/ धुळे/ यवतमाळ वनवृत्त.
७. उपवनसंरक्षक (सर्व)
८. महालेखापाल-I/II (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
९. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती फ-९ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.